महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेशोत्तर परीक्षा) नियम १९८५ अनुसार दि. २४.०५.१९९९ च्या अधिसूचनेपूर्वी नियुक्त जि.प.कर्मचा-यांच्या सेवा ज्येष्ठता निश्चित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः सेवाजे-२००८/प्र.क्र.३९/आस्था-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४००००१
तारीख: ३१ मार्च, २०१७.

वाचा -

१) शासन अधिसूचना ग्रामविकास व जलसंधारण विभाग, दि.२०.०१.१९८६. महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेशोत्तर परिक्षा) नियम १९८५.
२) शासन अधिसूचना, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-सेप्रप-११९४/ सीआर-१५१२/१३, दिनांक- २४.०५.१९९९.
३) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर यांनी रिट याचिका क्र.१६१०/२०१३ मध्ये दिनांक ५.१०.२००४ रोजी दिलेला निर्णय.
४) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर यांनी रिट याचिका क्रमांक-५५५/ २००७ मध्ये दिनांक १९.१२.२००९ ला दिलेला निर्णय.
५) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांनी रिट याचिका क्रमांक- ३६८८/२०११, मध्ये दिनांक २६.०८.२०११ ला दिलेला निर्णय.
६) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांना लिहिलेले शासनाचे समक्रमांकाचे दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ चे पत्र.

## शासन परिपत्रक

संदर्भाधिन क्र.१ येथील अधिसूचनेन्वये महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (सेवाप्रवेशोत्तर परीक्षा) नियम १९८५ मध्ये दिनांक २४.५.१९९९ च्या संदर्भ क्र.२ येथे नमूद केलेल्या अधिसूचनेद्वारे सुधारणा करण्यात आली आहे. या सुधारणेनुसार विहीत संधीत व विहीत वर्षात उमेदवाराने सेवा प्रवेशोत्तर परिक्षा उत्तीर्ण न केल्यास त्या उमेदवाराची सेवा जेष्ठता बाधीत होते. सदर सुधारणेनुसार सेवाजेष्ठता निश्चित करण्याबाबत उपिस्थत मुद्यांच्या अनुषंगाने समक्रमांकाच्या दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ च्या पत्राद्वारे खुलासा करण्यात आला आहे. तथापि, या विषयासंदर्भात मा. उच्च न्यायालय,

खंडपीठ, नागपूर आणि मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद यांनी दिलेल्या आदेशाशी सदर खुलासा सुसंगत नसल्यामुळे संदर्भाधिन क्र.६ येथील समक्रमांकाचे दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ चे पत्र पूर्वलक्षी प्रभावाने रद्द करण्यात येत आहे.

२. या संदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.१६१०/२००३, १५५/२००७, ३६८८/२०११ दाखल झालेल्या होत्या. या रिट याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानंतर प्रकरण अभिप्रायार्थ विधी व न्याय विभाग यांच्याकडे पाठविण्यात आले होते. विधी व न्याय विभागाने या प्रकरणात वरील संदर्भ क्र.३) , ४) व ५) मध्ये नमूद तीनही रिट याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशावर खालीलप्रमाणे अभिप्राय दिलेले आहेत.

Writ Petition No-१६१०/२००३

| Issue | Obersvations |
|---|---|
| Applicability of Zilla Parishad District Services Post Recruitment Examination (Amendment) Rules, १९९९ to the employee who have passed the examination before amendment. | Hon॰ble High Court held that those employees who have passed the post Recruitment Examination prior to the amended Rules of १९९९ shall be governed by pre-amended Rules i.e. Rules of १९८५. |

Writ Petition No.५५५/२००७

| Issue | Obersvations |
|---|---|
| Issue involves regarding the seniority list of the employees prepared after the year २०००. | Hon॰ble High Court held that seniority list of the employees prepared after the year २००० shall be governed by the amended Rules १९९९. |

Writ Peririon No. ३६८८/२०११

| Issue | Obersvations |
|---|---|
| Issue involved in this matter that employee who have not passed the examination in the prescribed period or chance s as specified in rule ४- whether such employees shall be | Hon॰ble High Court dismissed the Writ Petition and confirmed that respondent authorities have rightly acted in accordance with the amended Rules of १९९९. (१९८५ नुसार विहीत संधीत व वर्षात |

| Issue | Obersvations |
|---|---|
| governed by amended Rules of १९९९ or pre-amended rule i.e. Rules of १९८५ | परिक्षा पास न झाल्यास सेवा जेष्ठता बाधीत होत नाही. मात्र सन २०११ मध्ये सेवा जेष्ठता यादी बनवितांना दिनांक २४.५.१९९९ च्या अधिसूचनेच्या आधारे जेष्ठता यादी बनवून, त्यांची सेवा जेष्ठता बाधीत केली म्हणून याचिका दाखल) |

१) रिट याचिका क्रमांक १६१०/२००३: - १९९९ च्या सुधारीत सेवाप्रवेश नियम अस्तित्वात येण्यापुर्वी ज्या उमेदवारांनी सेवाप्रवेश परिक्षा पास झाले आहेत त्यांचे संनियंत्रण १९८५ च्या सेवाप्रवेश नियमानुसार होईल.

२) रिट याचिका क्रमांक ५५५/२००७: - सन २००० नंतर सेवा जेष्ठता यादी बनवितांना ती १९९९ च्या सुधारीत सेवाप्रवेश नियमाच्या आधारे बनविणे आवश्यक आहे.

३) रिट याचिका क्रमांक ३६८८/२०११: - सक्षम प्राधिकाऱ्यांची १९९९ च्या सुधारीत सेवा प्रवेश नियमाखालील कार्यवाही योग्य ठरवून याचिका कर्त्यांचा दावा फेटाळला आहे.

३. मा. उच्च न्यायालयाचे आदेश व विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय पाहता असे स्पष्ट होते की, दिनांक २६ मे, १९९९ पूर्वीच्या सेवा प्रवेशोत्तर परिक्षा हया १९८५ च्या नियमानुसार सनियंत्रित असल्या पाहिजेत व त्यावेळेच्या कर्मचा-यांना त्या नियमाखालील नियम लागू राहतील.

४. म्हणजेच महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा सेवाप्रवेशोत्तर परिषद १९८५ च्या नियमानुसार १९८५ पासून २६ मे, १९९९ पर्यतच्या कालावधीत एखादया उमेदवाराने जिल्हा परिषद सेवाप्रवेश परिक्षा विहीत कालावधीत व संधीत पास झाले नाहीत तर उमेदवारास कोणकोणत्या परिणामांना सामोरे जावे लागेल ते खालील नियमात स्पष्ट केलेले आहे.

*५) (१) Consequences of failure to pass the Examination: - (१) A parishad employee who fails to pass the examination within the period and chances specified in rule ४ shall not, until he passes the Examination or is exempt from passing the Examination under rule ६ - (a) be confirmed in the post which he is holding :(b) be allowed to draw his next increment in the scale of the post which he is holding.*

५ (२) Increments so withheld under paragraph (b) of sub-rule (१) shall become payable to a Parishad employee with effect from the date on which he passes the Examination and future increments shall occur as if no increment was withheld. The arrears of increment shall not be admisible for the period during which his increment was so withheld.

५ (३) Notwithstanding anything contained in sub-rule (१) or (२), a Parishad employee appointed to the post by nomination after the appointed date who fails to pass the Examination within the period and chances specified in rule ४ shall be liable for termination of his services.

५ (१) अशी परिक्षा विहीत वेळेत संधीत जो पर्यत संबंधीत उमेदवार पास होत नाहीत तोपर्यत त्यांना खालील बाबींचा लाभ मिळणार नाही. (अ) ज्या पदावर संबंधीत कर्मचारी कार्यरत आहेत त्या पदावर कायम करणे. (ब) ज्या पदावर ते (उमेदवार) कार्यरत आहेत त्या पदाची पुढील वेतनवाढ मिळणे.

५ (२) सदरच्या थोपवलेल्या वेतनवाढी, संबंधीत उमेदवार सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास झाल्यानंतर लगेच पूर्ववत सुरु करणे.

५ (३) नियुक्ती दिनांकानंतर सेवेत आलेले उमेदवार जर विहीत संधीत व विहीत वर्षात सदर पदाची सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास झाले नाहीत तर त्यांच्या सेवा समाप्त करण्यात याव्यात.

६. तसेच अशा उमेदवारांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होण्यापासून सूट दिलेली आहे.

७. सन १९९९ च्या नियमाद्वारे १९८५ च्या सेवा प्रवेश नियमातील नियम ५ (३) मध्ये (ज्यात सेवेतून काढून टाकण्याची तरतूद होती) सुधारणा करुन जे उमेदवार विहीत संधीत वा विहीत कालावधीत सेवा प्रवेश परिक्षा उत्तीर्ण होणार नाहीत अशा उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल अशी तरतूद केलेली आहे. १९८५ च्या नियमातील अन्य तरतुदी संबंधीत उमेदवारांना लागू आहेत.

८. वरील सर्व बाबी पहाता सन १९८५ च्या सेवाप्रवेश नियमानुसार संबंधीत उमेदवार जर सेवा प्रवेशोत्तर परिक्षा विहीत वेळेत व संधीत पास झाले नाहीत तर त्यांना त्या पदावर कायम करता येत नाही म्हणजे जे उमेदवार कार्यरत पदावर कायमच नाहीत अशा उमेदवारांना सेवेत पदोन्नती देता येणार नाही. म्हणजे पर्यायाने त्यांचे नांव सेवा ज्येष्ठता यादीत येणार नाही. जोपर्यत सदर उमेदवार पास होत नाहीत तोपर्यत त्यांना सेवा ज्येष्ठता मिळणार नाही. त्यानंतर सदर परिक्षा पास होतील त्या दिवसाचा दिनांक त्यांना जेष्ठतेसाठी मिळणार आहे. मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. १६१०/२००३ व रिट याचिका क्र.३६८८/२०११ मध्ये दिलेले अनुक्रमे दिनांक ५.१०.२०१४ व दिनांक २६.०८.२०११ चे आदेश पहाता जे उमेदवार १९९९ पूर्वी जिल्हा परिषदेच्या सेवेत कार्यरत आहेत अशा उमेदवारांना १९८५ चे सेवा प्रवेश नियम लागू होतील म्हणजे जोपर्यत सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होत नाहीत तोपर्यत त्यांना सेवेत कायम करता येत नाही व सेवेत कायम नसलेल्या उमेदवारास पदोन्नती देता येत नाही वा असे उमेदवार पदोन्नतीस पात्र ठरत नाहीत. त्यावेळी असे उमेदवार सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होतो ती तारीख अशा उमेदवारांच्या सेवा ज्येष्ठतेसाठी निश्चित करावयाची आहे.

९. वरील सर्व बाबी विचारात घेता मा. उच्च न्यायालयाचे आदेश विधी व न्याय विभागाचे अभिप्राय विचारात घेता असे स्पष्ट होते की जे उमेदवार २६ मे, १९९९ पूर्वी जिल्हा परिषदेच्या सेवेत आलेले आहेत

असे उमेदवार सन १९८५ च्या सेवा प्रवेशोत्तर परिक्षा नियमानुसार विहीत संधीत व विहीत वेळेत सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास झालेले नाहीत अशा उमेदवारांसंबंधी खाली नमूद केल्यानुसार १९८५ मधील नियमानुसार कार्यवाही अपेक्षित आहे.

अ) कार्यरत असलेल्या पदाची वेतनवाढ मिळणार नाही.

ब) कार्यरत असलेल्या पदावर त्यांना कायम करता येणार नाही. पर्यायाने ते सदर पदावर कायम नसल्याने त्यांना सेवा जेष्ठतेचा लाभ मिळणार नाही. पर्यायाने त्यांना वरिष्ठ पदावर पदोन्नती देता येणार नाही. विहीत कालावधीत उत्तीर्ण न झालेले उमेदवार ज्या दिवशी अशी सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होतील त्याच्या दुस-या दिवशी असा उमेदवार पदोन्नतीकरिता ज्येष्ठता यादीत समावेश करण्यास पात्र होईल. त्यांना पूर्वलक्षी प्रभावाने पदोन्नतीस पात्र धरता येणार नाही.

क) ज्यावेळी संबंधीत उमेदवार सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होईल त्यावेळी त्याच्या रोखण्यात आलेल्या वेतनवाढी कोणत्याही थकबाकीशिवाय पूर्ववत सुरु करण्यात येतील.

ड) जे उमेदवार वयाची ४५ वर्षे पूर्ण करे पर्यत सेवा प्रवेशोत्तर परिक्षा पास होणार नाहीत त्यांना वयाची ४५ वर्षे पूर्ण झाल्यावर ही परीक्षा पास होण्यापासून सूट मिळेल व त्यानुसार सूट मिळाल्याच्या दिनांकापासून त्या उमेदवाराचा पदोन्नतीसाठीच्या सेवा ज्येष्ठता यादीत समावेश होईल. पर्यायाने अशी सूट दिल्यानंतर त्यांना सेवेत कायम करण्यात येईल व तदनंतर ते विहीत कार्यपध्दतीनुसार पदोन्नतीस पात्र होतील.

१०. दिनांक २४ मे, १९९९ नंतर सेवेत आलेल्या उमेदवारांना महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा प्रवेशोत्तर परिक्षा नियम १९९९ लागू होईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११२१३२३३०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bharat A Patil
Digitally signed by Bharat A Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c76c164f6ef274ed4e9237b7a5059a808d0bc9533462a615c99dc441b7638c25, cn=Bharat A Patil
Date: 2017.04.03 14:29:40 +05'30'

भरत पाटील
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सर्व विभागीय आयुक्त.

२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

३) ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने.

४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई-३२.
५) विधी व न्याय विभाग , मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवडनस्ती, आस्था-१०.